# मुले

भारतीय लोक आपले प्रत्येक काम म्हणजे देवाची भक्ती मानतात. संगीतकार, शेतकरी, शिक्षक आपले कार्य जणू देवाला अर्पण करतात. तेव्हा आपली कृतज्ञता व्यक्त करण्याचा साधा मार्ग म्हणजे त्या परमेश्वराचीच फुले असणाऱ्या मुलांजवळ व्यक्त होणे.

'मिशीवाली आई' म्हणून मुलांमध्ये प्रसिद्ध असलेले 'गिजुभाई बधेका' यांच्या खालील कवितेचा अनुवाद काशिनाथ त्रिवेदी ह्या शिक्षण मंत्र्यांनी हिंदीत केला. सतीश कुमार यांनी तो इंग्रजीत केला. हा मराठी अनुवाद:

## १.मूल

मूल आहे पालकांचा आत्मा,
मूल आहे घराचा दागिना,
मूल आहे बागेचे सौंदर्य,
मूल आहे कुटुंबाचा प्रकाश,
आणि मूल आहे आपल्या आयुष्यातील हसरी पालवी.

## २. मुलाची भेट

कोणामुळे आपण दुःख विसरतो?
कोणामुळे आपला थकवा जातो?
कोण आपल्याला नैराश्यापासून वाचवतं?
कोणामुळे आपले घर हसण्या-खिदळण्याने भरुन जाते?
कोण आपले हास्य सदैव टिकवून ठेवते?
एक मूल आहे हे – देवाला शोधताय तर प्रथम मुलाचे बाल्य जपा.

## ३. शांतता

देवाच्या सर्व निर्मितींमध्ये अद्वितीय आणि निरागस म्हणजे मूल!
या मुलाच्या प्रगतीचा अंदाज घेऊया.
जे मुलाला स्वातंत्र्य देतात, तेच या जगात माणुसकी आणि शांतता दृढ करतात!

## ४. सांगा मला

मी कुठे खेळायचे?
उडी कुठे मारायची?
मी कोणाशी बोलायचे?
मी आईशी बोलतो तेव्हा व्यत्यय आणतो,
बाबांशी खेळायला जातो तेव्हा ते वैतागतात,
मी उड्या मारतो तेव्हा मला बस म्हणून सांगतात,
गाणे म्हणतो तेव्हा गप्प करतात.
सांगा मला मी कोठे जायचे? आणि मी काय करायचे?

## ५. मुलाला कृती करुद्या.

मुलाला कामे करायला आवडतात.
त्याला त्याचा रुमाल धुऊ देत,
तिला तिचा कप भरु देत,
त्याला फुलदाणी सजवू देत,
तिला तिचे ताट विसळू देत,
त्याला मटार सोलू दे,
तिला जेवण वाढू देत,
त्यांना कामे करु देत
पण अर्थात तिच्या गतीने आणि त्याच्या इच्छेने

## ६. मुलाला माहित आहे

मुलाला माहित आहे –
आपल्या डोळ्यात अमृत आहे की विष,
आपले शब्द गोड आहेत की कडू,
आपला स्पर्श मऊ आहे की रुक्ष,
आपले मन आदराने भारलेले आहे की तिरस्काराने,
मुलाला लगेच जाणवते,

त्याला सर्व काही माहित असते.

## ७. शत्रू

'झोपायला जा नाहीतर बागुलबुवा येईल आणि तुला घेऊन जाईल'
'खा नाहीतर म्हातारा तुला उचलून नेईल'
'वाघ येणार आहे'
'भूत येईल कधीही'
'पोलिस येतील'
'शांत रहा नाहीतर खोलीत कोंडून ठेवेन'
'पुस्तके वाच नाहीतर चांगले धपाटे खाशील'
जे मुलांना या पद्धतीने घाबरवतात तेच खरे मुलांचे शत्रू असतात.

## ८. आपण समजून घेतो का?

मुलाचे हास्य हा आयुष्याचा आनंद,
मुलाचे रडणे म्हणजे आयुष्यातील दुःख,
मुलांच्या हास्याने फुले फुलतात,
मुलांच्या रडण्याने ती कोमेजतात,
मुलांच्या हास्याची नितळ धून घरात लावण्याऐवजी आपण त्यांच्या रडण्याने रणशिंग का फुंकतो?

## ९. पृथ्वीवरील स्वर्ग

आपण जर मुलाला योग्य मान दिला,
तर पृथ्वीवर स्वर्ग उभारला जाईल.
मुलांच्या हास्यामध्ये आहे स्वर्ग
मुलांच्या आरोग्यामध्ये आहे स्वर्ग
मुलांच्या सक्षमतेमध्ये आहे स्वर्ग
स्वर्ग आहे मुलांच्या निरागस आणि चिंताविरहीत मनात.
स्वर्ग आहे मुलांच्या गुणगुणण्यात आणि स्वरात.

## १०. एक महान आत्मा

मुलाचे शरीर लहान आहे पण आत्मा महान आहे,

मुलाचे शरीर वाढते,

मुलाची शक्ती वाढते,

पण त्याचा आत्मा परिपूर्ण आहे.

अशा महान आत्म्याचा आपण आदर केला पाहिजे

आणि आपण आपल्या पद्धतींनी मुलाला भ्रष्ट करता कामा नये.

## ११. जाणीव

मूल एक परिपूर्ण व्यक्ती आहे.

मुलाकडे हुशारी, भावना, मन आणि समज आहे.

मुलाकडे गुण आहेत आणि अवगुणही.

मुलाची आवड आहे तशी नावडही.

मुलाच्या इच्छा ओळखून घेऊया.

मुलाच्या भावना समजून घेऊया.

मूल लहान आणि निरागस आहे.

आपल्या अहंकाराने त्या मुलाकडे दुर्लक्ष होता कामा नये.

आपल्या स्वाभिमानाने त्या मुलाचा अपमान होता कामा नये.

## १२. आत्मनिर्भर

मूल स्वतः खाईल, त्याला भरवू नका.

मूल अंघोळ करेल, त्याला जबरदस्ती करु नका.

मूल चालेल, त्याला ढकलू नका.

मूल गाणे म्हणेल, त्याला गायला सांगू नका.

मुल खेळत असेल, तर त्यात हस्तक्षेप करु नका.

आत्मनिर्भर होणे ही मुलाची गरज आहे.

## १३. तुम्ही इतकेही करु शकणार नाही

तुम्ही तुमच्या क्लबमध्ये जाण्यापेक्षा मुलाला बागेत घेऊन जा.
गप्पा मारत बसण्यापेक्षा मुलाला प्राणी दाखवा.
वर्तमानपत्रात घुसण्यापेक्षा मुलाचे बोलणे ऐका.
रात्री झोपायला जाताना मुलाला गोष्ट सांगून खूष करा,
मुलामधे रस घ्या.

## १४. मोठ्यांची कृपा

जेथे पालक प्रेमाने रहातात ते एक सुंदर घर असेल
गुलाबी मुले आजूबाजूला खेळत असतील ते एक सुंदर घर असेल
स्वतःची काळजी घेतल्याप्रमाणे जेथे पालक मुलांची काळजी घेतील ते एक सुंदर घर असेल
मोठ्यांकडून मुलांना मान मिळेल ते एक सुंदर घर असेल
आणि जेथे मुले कोणाच्या कृपेने रहात नसतील ते एक सुंदर घर असेल.
हो, तेच असेल सुंदर घर!

## १५. स्वतःसाठी

मुलांना मान द्या जेणेकरुन आपण आपला मान ठेवू शकू.
मुलांवर ओरडणे थांबवा जेणेकरुन ओरडण्याच्या वाईट सवयीतून आपण मुक्त होऊ.
मुलांना मारणे थांबवा जेणेकरुन आपण हिंसा आणि दुराचारापासून लांब राहु.
आपण जेव्हा स्वतःला सुधारु तेव्हा निश्चितच एका चांगल्या वातावरणात मूल वाढेल.

## १६. भीती आणि आमिषे

पालकांना आणि शिक्षकांना जाणवू दे की भीती आणि आमिषांनी आपण सदाचार शिकवू शकत नाही.
भीतीने मुले कोडगी होतात.
आमिषांनी मुले स्वार्थी होतात.
भीती आणि आमिषांनी निलाजरी आणि दयनीय होतात मुले.

## १७. घर हीच खरी शाळा.

पालकांना जर वाटत असेल की त्यांच्या आवडीप्रमाणे

आणि सदाचाराने ते मुलांना शिकवत आहेत
तर ती त्यांची फार मोठी चूक आहे
पालक आणि घर हीच खरी मोठी शाळा आहे
घरांमध्ये बिथरलेल्या मुलांना देवही वाचवू शकत नाही.

## १८. निसर्गाची भेट

निसर्गापासून दूर केलेल्या मुलांना निसर्गाची रहस्ये कशी माहित असणार?
सौम्य चंद्रप्रकाश, वाहती नदी, शेतजमिनी, शेतामधील झोपड्या,
पर्वतातील दगड, शुद्ध हवा आणि आभाळाचे रंग
सर्वच निसर्गाचे चमत्कार आणि मुलांचा निसर्ग.
मुलांचे मन भरेपर्यंत ह्या निसर्गाचा आस्वाद त्यांना लुटू द्या.

## १९. सक्रिय

मूल हरघडी अचपळ आहे
मुलाच्या डोळ्यात कुतुहल आहेत
मुलाचे मन व्यक्त होऊ पहाते
मुलाच्या व्याकरणात फक्त प्रश्न आणि आश्चर्य आहे
त्याला पूर्णविराम नाही की स्वल्पविराम
मूल एक चैतन्यमयी पुनर्जन्म आहे.

## २०. नवे युग

सापांची पूजा करण्याचे युग गेले.
भुतांच्या पुजेचेही युग गेले.
दगड आणि मुर्त्यांची पूजा आता होत नाही.
मुलाची पूजा करण्याचे हे युग आहे.

## २१. भांडणे

पालकांमधील भांडणे घरात विष पसरवते.

मुलांना त्याचा भयानक त्रास होतो.
मुलांसाठी, मोठ्यांनी शांततेने रहायला शिकले पाहिजे.
घरातील आनंद हा शिक्षणाचा मुख्य स्त्रोत आहे.

## २२. माझे ऋण

मुलांनी त्यांच्या प्रेमाने मला सन्मानित केले.
मुलांनी मला नवीन आयुष्य दिले.
मुलांनी शिकवताना मी बरेच काही शिकलो.
मुलांसाठी वाचताना मी बरेच काही वाचले.
मुलेच खरतर शिक्षक असतात हे शिक्षक झालो म्हणून उमगले.
ही काही कविता नाही, हा अनुभव आहे.

## २३. जीवंत पुस्तके

पुस्तके वाचून जे शिकतात ते शिक्षक होतात.
मुलांकडून जे धडे घेतात ते शहाणे होतात.
आणि प्रत्येक शहाण्यासाठी एक मूल हे असामान्य जीवंत पुस्तक आहे.

## २४. देवाची मुले

तुम्ही जगाला फसवू शकता, पण मुलाला फसवू शकत नाही.
तुम्ही जगाला मूर्ख बनवू शकता पण मुलाला मूर्ख बनवू शकत नाही.
सामान्य माणसांपासून तुम्ही गोष्टी लपवून ठेवू शकता,
पण मुलापासून तुम्हाला काहीच लपवता येत नाही.
त्यांना सर्व काही माहित असते, ते सर्वत्र असतात
ते सर्वव्यापी असतात.
या देवरुपी मुलांचे भक्त व्हा.
तुमची भक्ती स्थिर असूद्या.
हीच खरी यशाची गुरुकिल्ली.

## २६. व्यर्थ आहे बडबड

मुलांबद्दल वाचले, लिहिले, विचार केला...झाले?
नाही. आपल्याला नवीन मंदिरे उभारायची आहेत.
आणि त्यात ज्ञान आणि विवेकाची स्थापना करायची आहे.
मुलांचे नवे युग सुरु झाले आहे.
फक्त बोलून फायदा नाही,
आपल्याला काहीतरी करुन दाखवायचे आहे, कृतीत आणायचे आहे.

## २७. योग्य परिश्रम

मुलांसोबत काम करणे अवघड आहे
मुलाचा स्वभाव ओळखणे, त्याच्या भावना स्थिर करणे आणि त्याला मान देणे ही गरज आहे
मुलावरचा विश्वास आणि प्रेम ह्या कठीण बाबी
त्यासाठी तुम्हाला घाम गाळावा लागेल.

## २८. लक्षात ठेवा

चंदनाच्या चुऱ्यापेक्षा मुलाला रस्त्यावरची धूळ जास्त प्रिय असते.
आईच्या पापीपेक्षा एखादा सुवास मुलाला अधिक गोड असतो.
कोवळी सूर्यकिरणे मिठीसारखी मऊ भासतात.

## २९. मी स्वस्थ कसा बसू?

जोपर्यंत मुले घरात विखुरली जातात
आणि शाळेत अपमानित होतात
तोपर्यंत मी स्वस्थ कसा बसू?
जोपर्यंत मुलांना खेळायला मैदाने, कामांसाठी बगिचे,
शिकायला जागा नाहीत.
स्वतंत्र वाढायला घरे नाहीत, मी स्वस्थ कसा बसू?
मुलांना प्रेम आणि मान मिळत नाही तर मी स्वस्थ कसा बसू?

## २९. सर्व मुले समान आहेत

मुले आहेत विभिन्न वैशिष्ट्यांची:
दुर्बल आणि अंध, तेजस्वी आणि मागास,
सुंदर आणि कुरूप, काळी-गोरी.
काही मुले आहेत हुषार, सुदृढ,
मस्तीखोर, व्रात्य आणि धूर्त.
पण खऱ्या शिक्षकासाठी सर्व मुले समान आहेत
सर्व, देवाची मुले.

## ३०. मैदाने

घाणेरड्या आणि असुरक्षित रस्त्यांवरुन
आपण आपल्या हजारो मुलांना भटकू देणार काय?
नाही. आपण त्यांना ऊबदार घरे देणार
जेथे ती त्यांच्या सर्जनशीलतेमध्ये मग्न आहेत.
प्रत्येक चौकात खेळायला मैदानेसुद्धा देणार
जेथे विकास होईल त्यांच्या शरीर आणि मनाचा.
मुलांच्या विकासासाठी सर्वाधिक महत्त्वाची आणि स्वस्त माध्यमे ही मैदाने!

## ३१. करा किंवा मरा

छोट्याशा देहातून डोकावणाऱ्या त्या महान आत्माची झलक मला सदैव खुणावते
हीच माझी खरी प्रेरणा
मुलांचे स्वत्व पुनर्प्रस्थापित करण्यासाठी मी जगतो आहे
आणि ते करत असतानाच मला मरण यावे

## ३२. धार्मिक शिक्षण

धर्माबद्दल बोलून किंवा धार्मिक कृत्ये करुन
किंवा पारंपारिक वेष परिधान करुन
आपण मुलांना धर्म शिकवू शकत नाही

धर्म पुस्तकांत नाही की मृत सिद्धांतामध्ये नाही
धर्म आहे जीवनामध्ये.
पालक आणि शिक्षक जर धर्माने जगले
तर मुलाला आपोआपच धर्माचे ज्ञान होईल

## ३३. आत्मनिरिक्षण करा.

तुम्ही देव नाही, मग मुलाशी वागताना देव असल्यासारखे का वागता?
तुम्ही सर्वज्ञ नाही, मग मुलाच्या अज्ञानाला का हसता?
तुम्ही सर्वशक्तिमान नाहीत, तर मुलाच्या असहायतेवर का चिडता?
तुम्ही काही परिपूर्ण नाहीत, मग मुलांच्या कमतरतेला का वैतागता?
आधी स्वतःकडे पहा आणि मग मुलाकडे.

अनुजा सामंत - ९७६९४७००९८